**वनक्षेत्रपाल, (गट-ब) या संवर्गाच्या नियुक्तीचा मर्यादित विभागीय परिक्षा कोटा रद्द करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एफएसटी-०१/२२/प्र.क्र.०८/फ-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०१ फेब्रुवारी, २०२२

**वाचा :-**

१. शासन अधिसूचना,महसूल व वन विभाग क्र.एफटीआर-१२९०/३०२/फ-४, दि.०६.०४.१९९८.
२. शासन अधिसूचना,महसूल व वन विभाग क्र.एफएसटी-०३/१४/२२१/फ-४, दि.०५.०२.२०१५
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१०(१)/ आस्था/एक/प्र.क्र.१२/(१५/१६)/ ४९१ दि.१६.०३.२०२०
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१०(१)/ आस्था/एक/ प्र.क्र.१२/(१५/१६) /भाग-२/ २४५ दि.०९.११.२०२१

**प्रस्तावना :-**

शासन अधिसूचना, महसूल व वन विभाग क्र.एफएसटी-०३/१४/२२१/फ-४, दि.०५.०२.२०१५ अन्वये मार्यादित विभागीय परिक्षेद्वारे वनपालातून वनक्षेत्रपालाची निवड करण्याची तरतूद करण्यात आलेली असून, या परिक्षेस बसण्याकरीता वनपाल हा विज्ञान शाखेतील पदवीधर व वय ४२ पेक्षा कमी असावे अशी तरतुद आहे. तथापि वनपाल या संवर्गात कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांमध्ये मर्यादित विभागीय परिक्षेद्वारे निवडीकरीता पुरेसे उमेदवार उपलब्ध न झाल्याने सन २०१५ पासून मर्यादित विभागीय परिक्षा आयोजित करता आलेल्या नाहीत.

तसेच प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर यांच्या अध्यक्षतेखाली वनक्षेत्रापाल या संवर्गाच्या सेवाप्रवेश नियमांतील सुधारणांसदर्भात नियुक्त करण्यात आलेल्या समितीने वनपाल या संवर्गातून वनक्षेत्रपाल या संवर्गाच्या निवडीसंदर्भातील मर्यादित विभागीय परिक्षेचा कोटा रद्द करण्याची शिफारस केलेली आहे. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर यांच्या अध्यक्षतेखालील समितीने केलेली शिफारस तसेच प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख ), नागपूर यांनी त्यांचे संदर्भीय पत्रान्वये सादर केलेले प्रस्ताव विचारात घेता, वनपाल या संवर्गातून वनक्षेत्रपाल या संवर्गाच्या नियुक्तीचा मर्यादित विभागीय परिक्षेचा कोटा रद्द करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

वनपाल संवर्गातून वनक्षेत्रपाल या संवर्गातील मर्यादित विभागीय परिक्षेव्दारे नियुक्तीसंदर्भात प्रस्तावनेमध्ये नमुद वस्तुस्थिती विचारात घेता, वनपाल संवर्गातून वनक्षेत्रपाल या संवर्गाच्या नियुक्तीसंदर्भातील मर्यादित विभागीय परिक्षेचा कोटा दि. ०५.०२.२०१५ पासून पूर्वलक्षीप्रभावाने रद्द करण्यात येत असून, सदर कोट्यातील पदे पदोन्नतीने भरण्यात येतील. यानुषंगाने वनक्षेत्रपाल पदाच्या सेवाप्रवेश नियमांमध्ये यथावकाश सुधारणा करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२०११६३६४३८४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHOK KASHINATH LAKKAS

Digitally signed by ASHOK KASHINATH LAKKAS
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=84261302514df14d17b0d46bb1422d22bfc355b1a840ece50f14894cd6b0da24, cn=ASHOK KASHINATH LAKKAS
Date: 2022.02.01 16:40:02 +05'30'

**(अ.का.लक्कस)**
**कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग**

**प्रत-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६. सर्व मुख्य वनसंरक्षक(प्रा.) /वनसंरक्षक(प्रा) सर्व
७. निवड नस्ती फ-४, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.